**महात्मा ज्योतिबा फुले जल व भूमी संधारण अभियान २०११-१२ मधील अनुषंगिक खर्चासाठी राष्ट्रीय कृषि विकास योजनेतून निधी उपलब्ध करुन देणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
शासन निर्णय क्र.जलसं-२०११/प्र.क्र.२८/जल-८
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २८ एप्रिल, २०११.

**संदर्भ :-**

(१) शासन निर्णय, ग्रा. वि. व ज. विभाग, क्र.जलसं-२००२/प्र.क्र.५८१/जल-७, दि.२८ फेब्रुवारी, २००२.
(२) शासन निर्णय, ग्रा. वि. व ज. विभाग, क्र.जलसं-२०११/प्र.क्र.१६/जल-८, दि.३० मार्च,२०११.
(३) शासन पत्र, कृषी व पदुम विभाग क्र. राकृवि-२०११/प्र.क्र.४५/राकृवियो-कक्ष, दिनांक २८ एप्रिल, २०११.

**प्रस्तावना** :-

राज्यातील पर्जन्याधारित कोरडवाहू शेतीसाठी पाणलोट व जलसंवर्धन माध्यमातून जलसिंचन उपलब्धता वाढविणे, अत्यंत मौल्यवान असे पाणी व माती यांचे संवर्धन करणे, पडीक जमिनीचा विकास करणे, रोजगार उपलब्धतेत वाढ करणे आणि पर्यायाने कृषि उत्पादनात वाढ करणे, मौल्यवान भूसंपत्तीमध्ये सुधारणा करणे याकरिता महात्मा ज्योतिबा फुले जल व भूमी संधारण अभियान राज्यात दि.१ मे,२००२ पासून सुरु करण्यात आले आहे. हे अभियान प्रामुख्याने स्थानिक स्वराज्य संस्था, स्वयंसेवी संस्था तसेच ग्रामीण भागातील जनतेच्या सहभागातून राबविण्यात येते. हे अभियान सन २०११-१२ मध्ये सुरु ठेवण्यास वर नमूद दि.३० मार्च, २०११ च्या शासन निर्णयान्वये मंजुरी देण्यात आली आहे. या अभियानाद्वारे जुन्या जलस्त्रोतांचे बळकटीकरण, गाळ काढणे तसेच अभियानाचा प्रचार व प्रसिध्दी करुन त्याबाबत लोकांमध्ये जागृती करणे, अशा स्वरुपाचे कार्यक्रम घेण्यात येतात. हे अभियान लोकसहभागातून राबविण्यात येत असले व गाळ काढण्यासाठी जिल्हाधिकाऱ्यांमार्फत मोफत यंत्रसामुग्री उपलब्ध होत असली तरी लोकसहभाग वाढविण्याच्या दृष्टीने अभियानाची प्रसिध्दी जाहिरातीद्वारे करणे तसेच यंत्रसामग्रीसाठी लागणाऱ्या इंधनासाठी निधीची आवश्यकता भासत असल्याने अभियान राबविण्यास काही प्रमाणात मर्यादा येण्याची शक्यता निर्माण झाली होती.

राष्ट्रीय विकास परिषदेने पारित केलेल्या ठराव क्र.५३ नुसार अकराव्या पंचवार्षिक योजनेत ४ टक्के कृषि विकासाचे उद्दिष्ट ठरविले आहे. हे लक्षात घेऊन केंद्रिय कृषि मंत्रालयाने राष्ट्रीय कृषि विकास योजना जाहीर केलेली आहे. राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत केंद्र शासनाने प्रसिध्द केलेल्या मार्गदर्शक सूचनेनुसार मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समिती गठीत करण्यात आली आहे. या समितीच्या दि. १५ एप्रिल,२०११ रोजी मुंबई येथे झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार सन २०११-१२ मध्ये महात्मा ज्योतिबा फुले जल व भूमी संधारण अभियानाच्या प्रचार व प्रसिध्दी तसेच गाळ काढण्यासाठी वापरण्यात येणाऱ्या यंत्रसामुग्रीच्या इंधनासाठी एकूण रु. ३००० लक्ष निधी उपलब्ध करुन देण्याच्या प्रस्तावास उक्त दिनांक २८ एप्रिल, २०११ च्या पत्रान्वये मंजुरी दिल्याचे कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाने कळविले आहे. त्यामुळे सदर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

वर नमूद केल्याप्रमाणे दि.३० मार्च,२०११ च्या शासन निर्णयान्वये महात्मा ज्योतिबा फुले जल व भूमी संधारण अभियान सन २०११-१२ मध्ये राबविण्यास मंजुरी दिली असून या अभियानांतर्गत करण्यात येणाऱ्या कामांमध्ये उपलब्ध जुन्या जलस्त्रोतांचे बळकटीकरण होणार असल्याने तसेच गाळ काढल्यामुळे जलस्त्रोतांच्या पाणी

साठविण्याच्या क्षमतेत वाढ होणार आहे. परिणामी, कृषि उत्पन्नात वाढ होण्यास हे अभियान उपयुक्त ठरणार आहे. ही बाब लक्षात घेऊन या अभियानाच्या प्रचार व प्रसिध्दी तसेच त्यातील गाळ काढणे या बाबीसाठी जिल्हाधिकाऱ्यांमार्फत स्थानिक पातळीवर उपलब्ध होणाऱ्या यंत्रसामुग्रीच्या इंधनासाठी व इतर अनुषंगिक बाबींसाठी राष्ट्रीय कृषि विकास योजनेतून रु.३००० लक्ष निधी वितरीत करण्यास शासन मंजुरी देत आहे. सदर निधी आयुक्त (कृषि), पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत असून उपलब्ध होणाऱ्या निधीचे वाटप पुढीलप्रमाणे करण्यास शासन त्यांना प्राधिकृत करीत आहे :-

**निधीचे वाटप** :-

**अ) प्रसिध्दी :**

अभियानाच्या जाहिरातीसाठी रु.४०० लक्ष इतका निधी राखून ठेवण्यात यावा. त्यापैकी राज्यातील ३३ जिल्ह्यातील प्रत्येक तालुक्यासाठी रु. ०.५० लक्ष याप्रमाणे ३५३ तालुक्यांसाठी रु.१७६.५० लक्ष निधीचे वाटप जिल्हास्तरीय समितीस करण्यात यावे. उर्वरित रु.२२३.५० लक्ष निधी आयुक्त (कृषि) यांचेकडे राज्यस्तरीय प्रसिध्दीसाठी राखून ठेवण्यात यावा. तसेच राज्यस्तरावर राज्य योजनेच्या पाणलोट विकास चळवळ या योजनेसाठी सन २०११-१२ या वर्षासाठी जाहिरात व प्रसिध्दी या बाबीसाठी अर्थसंकल्पित झालेला रु. १००.०० लक्ष निधीही राज्यस्तरीय प्रसिध्दीसाठी उपलब्ध करुन देण्यात येणार आहे. यामुळे राज्यस्तरावर उचित प्रसिध्दीसाठी एकूण रु. ३२३.५० लक्ष निधी उपलब्ध होईल.

तालुक्यांच्या प्रमाणात उपलब्ध झालेला निधी अभियानांतर्गत जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली नेमण्यात आलेल्या जिल्हास्तरीय समित्यांच्या अधिनस्त राहील. सदर निधी तालुका / उपविभागीय / जिल्हास्तरावर सरपंच मेळावे आयोजित करणे, अभियानाचे पोस्टर्स, घडीपत्रिका छापणे तसेच जिल्हास्तरीय समिती निश्चित करेल त्याप्रमाणे प्रसिध्दीसाठी खर्च करण्यात यावेत.

राज्य पातळीवरील रु. ३२३.५० लक्ष निधी अभियानाबाबत एस.टी.बसेस वरील जाहिराती, आकाशवाणीवरुन तसेच एस.टी.बस स्थानकांवर जिंगल्स, दूरदर्शन/आकाशवाणीच्या माध्यमातून जाहिराती व मोबाईल्सच्या माध्यमातून एस.एम.एस. द्वारे प्रसिध्दी यासाठी खर्च करण्यात यावा.

**ब) इंधन व इतर बाबींसाठी निधी** :-

शिल्लक रु.२६००.०० लाख निधीचे सर्व जिल्ह्यांना त्यांच्या भौगोलिक क्षेत्राच्या प्रमाणात वाटप करण्यात येत असून ते वाटप या शासन निर्णयासोबत जोडलेल्या **परिशिष्ट "अ"** मध्ये दर्शविण्यात आले आहे. हा निधी पुढील बाबींवर खर्च करण्यात यावा. या निधीच्या खर्चाच्या संदर्भात विस्तृत मार्गदर्शक सूचना आयुक्त (कृषी) यांनी तात्काळ निर्गमित कराव्यात.

अ) गाळ काढण्यासाठी वापरण्यात येणाऱ्या यंत्रसामुग्रीच्या इंधनासाठी
ब) जलस्त्रोतांची किरकोळ दुरुस्ती
क) गॅबियन बंधाऱ्यांच्या लोखंडी जाळया

२. इंधन व इतर अनुषंगिक बाबींसाठी राष्ट्रीय कृषि विकास योजनेतून हा निधी उपलब्ध होत असला तरी संदर्भाधीन दि. ३० मार्च, २०११ च्या शासन निर्णयातील परि.७ मध्ये नमूद केल्याप्रमाणे उपलब्ध होणारा निधीही या अभियानासाठी खर्च करावयाचा आहे.

३. हा शासन निर्णय मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या राज्यस्तरीय समितीच्या दिनांक १५ एप्रिल,२०११ रोजी झालेल्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०४२९१८०६२६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सुनील चव्हाण )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

मा.राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.मंत्री (जलसंधारण), यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री. (जलसंधारण) यांचे खाजगी सचिव
सर्व मा.मंत्री. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद,
प्रमुख मार्गदर्शक, महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद,
कार्याध्यक्ष. आदर्शगांव संकल्प व प्रकल्प समिती,
मुख्य सचिव यांचे सहसचिव,
सर्व अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालयीन विभाग
प्रधान सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त,
आयुक्त (कृषि). महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक. मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व संचालक. कृषि आयुक्तालय, पुणे
मुख्य अभियंता. लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर), पुणे
संचालक. सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक. भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे,
सर्व जिल्हाधिकारी.
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
सर्व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,
सर्व उपायुक्त (विकास), विभागीय आयुक्त कार्यालय ( सर्व)
सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
सर्व अधीक्षक अभियंता. पाटबंधारे,/सर्व अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे, (स्थानिक स्तर)
संचालक. अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
महासंचालक. माहिती व जनसंपर्क, मुंबई (प्रसिध्दीकरीता ),
सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
सर्व सहसंचालक. सामाजिक वनीकरण वृत्ते,
सर्व मुख्य वनसंरक्षक./ सर्व उपवनसंरक्षक,
वरिष्ठ भूवैज्ञानिक. भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा
महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषदेचे सर्व अशासकीय सदस्य,
महालेखापाल. (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य १ व २, मुंबई व नागपूर,
महालेखापाल, (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य १ व २, मुंबई व नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
सर्व मंत्रालयीन विभाग,
कार्यासन अधिकारी (राकृवियो कक्ष ), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
सर्व उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
जल-८ (निवड नस्ती), ग्रा.वि.व ज.सं.विभाग, मंत्रालय, मुंबई

...५

शासन निर्णय क्र.जलसं-२०११/प्र.क्र.२८/जल-८, दिनांक २९ एप्रिल, २०११ चे सहपत्र

## परिशिष्ट "अ"

| अ.क्र. | जिल्हा | तालुक्यांची संख्या | भौगोलिक क्षेत्र चौ.कि.मी. | वितरीत करावयाचा निधी (रु.हजारात ) |
|---|---|---|---|---|
| १ | ठाणे | १५ | ९५५८ | ८०९५ |
| २ | रायगड | १५ | ७१५२ | ६०५८ |
| ३ | रत्नागिरी | ९ | ८२०८ | ६९५२ |
| ४ | सिंधुदुर्ग | ८ | ५२०७ | ४४१० |
| ५ | नाशिक | १५ | १५५३० | १३१५३ |
| ६ | धुळे | ४ | ८०६३ | ६८२९ |
| ७ | नंदुरबार | ६ | ५०३४ | ४२६४ |
| ८ | जळगांव | १५ | ११७६५ | ९९६५ |
| ९ | अहमदनगर | १४ | १७०४८ | १४४३९ |
| १० | पुणे | १४ | १५६४३ | १३२४९ |
| ११ | सातारा | ११ | १०४८० | ८८७६ |
| १२ | सांगली | ९ | ८५७२ | ७२६० |
| १३ | सोलापूर | ११ | १४८९५ | १२६१६ |
| १४ | कोल्हापूर | १२ | ७६८५ | ६५०९ |
| १५ | औरंगाबाद | ९ | १०१०७ | ८५६० |
| १६ | जालना | ८ | ७७१८ | ६५३७ |
| १७ | परभणी | ९ | ६५१७ | ५५२० |
| १८ | हिंगोली | ५ | ४५२४ | ३८३२ |
| १९ | बीड | ११ | १०६९३ | ९०५७ |
| २० | नांदेड | १६ | १०५२८ | ८९१७ |
| २१ | उस्मानाबाद | ८ | ७५६९ | ६४११ |
| २२ | लातूर | १० | ७१५७ | ६०६२ |
| २३ | बुलढाणा | १३ | ९६६१ | ८१८३ |
| २४ | अकोला | ७ | ५४२९ | ४५९८ |
| २५ | वाशिम | ६ | ५१५३ | ४३६४ |
| २६ | अमरावती | १४ | १२२१० | १०३४२ |
| २७ | यवतमाळ | १६ | १३५८२ | ११५०४ |
| २८ | वर्धा | ८ | ६३०९ | ५३४३ |
| २९ | नागपूर | १४ | ९८०२ | ८३०२ |
| ३० | भंडारा | ७ | ३८९५ | ३२९९ |
| ३१ | गोंदिया | ८ | ५४२५ | ४५९५ |
| ३२ | चंद्रपूर | १४ | ११४४३ | ९६९२ |
| ३३ | गडचिरोली | १२ | १४४१२ | १२२०७ |
| | **एकूण महाराष्ट्र** | **३५३** | **३०६९७४** | **२६००००** |